सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील
अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना
आर्थिक मदत देण्याबाबत -
हवलदार तांगडे सोमनाथ अरविंद जि. सातारा.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०२३/प्र. क्र. ८०/का-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९/०५/२०२३.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८,दिनांक ०२/०८/२०१९.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग,पुणे यांचे पत्र क्र. १६०२५/ सैकवि-१६/८२८,दिनांक २१/०४/२०२३.

**प्रस्तावना**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सैनिकांच्या वारसांना तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सैनिकांच्या वारसांना संदर्भाधिन दिनांक ०२/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. १.०० कोटी इतकी आर्थिक मदत देण्यात येते.

**शासन निर्णय**

सैनिक कल्याण विभाग,पुणे यांनी दिनांक **२१ एप्रिल, २०२३** च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार, महाराष्ट्र राज्यातील धारातीर्थी पडलेले जवान, **हवलदार तांगडे सोमनाथ अरविंद, जि. सातारा** यांच्या अवलंबितांना पुढीलप्रमाणे आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| नाव व पत्ता | शहीद दिनांक,मोहिम व ठिकाण | वारसांचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| **नं १५६८२७०५A**<br>**हवलदार**<br>**तांगडे सोमनाथ अरविंद**<br>मु. पो. ओझर्डे, ता. वाई, जि. सातारा, ४१२८०३. | १६ एप्रिल, २०२१.<br>ऑपरेशन स्नो लिओपार्ड मोहिमेअंतर्गत पूर्व सिक्किम येथील आंतरराष्ट्रीय सीमेजवळ ऑपरेशनल ड्युटी. | श्रीमती रेश्मा सोमनाथ तांगडे (वीरपत्नी) :- रू. १ कोटी.<br>मु. पो. ओझर्डे, ता. वाई, जि. सातारा, ४१२८०३.<br>(शहीद सैनिक यांच्या आई-वडीलांचे निधन झाले आहे.) |
| | **एकूण** | **रुपये १.०० कोटी** |

२. **हवलदार तांगडे सोमनाथ अरविंद** यांच्या अवलंबितास एकूण अनुज्ञेय (रू. १.०० कोटी) रक्कमेपैकी रु. ५०,००,०००/- (रु.पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी (उर्वरीत अनुज्ञेय रकमेसाठी) होणारा खर्च रु. ५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) हा मागणी क्र.ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम,१०२-सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४)देशांतर्गत/सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५ २६०८) ५०-इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजुर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सातारा यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८) /२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०९१६२६४२५२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

URMILA POPAT SAWANT

Digitally signed by URMILA POPAT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=532e1c167ebaaff43f5811aa7e45b8f790eb47c4f4cdf5bad586d61ab9901df2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C586C9348CA72192AB033313815E031BC4374F8A3A8575A392F3FE875E8661EC, cn=URMILA POPAT SAWANT
Date: 2023.05.09 16:27:03 +05'30'

**(उर्मिला सावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१.महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३.महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४.कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५.जिल्हाधिकारी, सातारा
६.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
७.संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सातारा
९.सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीमती रेश्मा सोमनाथ तांगडे (वीरपत्नी) मु. पो. ओझर्डे, ता. वाई, जि. सातारा, ४१२८०३.
११. निवडनस्ती २प्रती.